**प्रशासकीय मान्यता :-**

पोलीस दलाच्या आधुनिकीकरणासाठी केंद्र शासनाने सन २००१-०२ करिता मंजूर केलेल्या रु.१३४१८.६४ लक्ष रकमेच्या कार्यक्रमास.

(योजनेत्तर)

## महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक पीएलएफ-१२०१/प्र.क्र.४७/पोल-४,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक ०५ जानेवारी,२००२,

**वाचा :-** १) केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे पत्र क्र.VI/२१०११/३०/२०००-GPA-I, दि.१.८.२०००, समक्रमांकाची पत्रे दि.३१.१२.२०००, २२.२.२००१, २९.३.२००१ व २५.४.२००१.

२) आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.डीजीपी/१७/६१६२/एमओडी/२०००-२००५, दि.३०.७.२००१.

३) सह पोलीस आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.पोआ/कक्ष-२/र. व का./५/संबंको/३२८/०१, दि.३१.७.२००१.

४) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अ.शा.पत्र क्र.मुं./का/२९५२/२००१, दि.१०.८.२००१.

५) गृह विभाग शासन निर्णय क्र.पीएलएफ-०१२०००/सीआर-१३/भाग-१८/पोल-४, दि.१७.९.२००१ व २१.१२.२००१.

६) गृह विभागाचे केंद्र शासनाला पाठविण्यात आलेले क्र.पीईक्यू-०९०१/प्र.क्र.२५/पोल-४, दि.१.१०.२००१ चे अ.शा. पत्र.

७) केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे पत्र क्र.VI-२१०११/२४/२००१-GPA-I, दि.१९.१२.२००१ व समक्रमांकाचे दि.२६.१२.२००१ चे अर्धशासकीय पत्र.

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाने त्यांच्या दि.१८.९.२००० च्या पत्रान्वये सन २०००-०१ या वित्तीय वर्षा पासून पोलीस दलाच्या आधुनिकीकरणासाठी राज्य शासनाला प्रतीवर्षी रु.९२.१० कोटी इतका निधी पुढील पाच वर्षात (सन २०००-०१ ते २००४-०५ पर्यन्त) देण्याचे मान्य केलेले आहे. सदर निधी मंजूर करतांना राज्य शासनाने सुध्दा तितकाच म्हणजे रु.९२.१० कोटीचा निधी पूरक निधी म्हणून (मॅचिंग ग्रँट) उपलब्ध करुन देण्याची अट केंद्र शासनाने घातलेली आहे. अशाप्रकारे प्रतिवर्षी एकूण रु.१८४.२० कोटी प्रमाणे ५ वर्षात एकूण रु.९२१ कोटी इतका निधी पोलीस दलाच्या आधुनिकीकरणासाठी उपलब्ध होणार आहे.

२. केंद्र शासनाच्या निदेशाप्रमाणे सन २०००-०१ ते २००४-०५ या कालावधीची पंचवार्षिक योजना तयार करुन शासनाच्या व शक्ती प्रदान समितीच्या मान्यतेनंतर सदर योजना केंद्र शासनाला दि.१.१०.२००१ रोजीच्या पत्रान्वये पाठविण्यात आलेली आहे. सन २०००-०१ करिता रु.१६६.२० कोटी इतक्या रकमेची योजना केंद्र शासनाने मान्य केलेली होती. सदर योजनेमधून रु.९०.०४ कोटी इतका निधी अद्यापपर्यंत खर्ची पडलेला असून उर्वरित रु.७६.१६ कोटीच्या कार्यक्रमास दि.२१.१२.२००१ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

३. आता केंद्र शासनाने त्यांच्या क्र.VI-२१०११/२४/२००१-GPA-I, दि.११.१२.२००१ च्या तसेच समक्रमांकाच्या दि.२६.१२.२००१ च्या पत्रान्वये सन २००१-०२ करिता सादर करण्यात आलेल्या रु.१८४.२४ कोटीच्या योजनेपैकी रु.१३४९८.६४ लक्ष रकमेच्या कार्यक्रमास मान्यता दिलेली असून त्याबाबतचा शीर्ष व विभागनिहाय तपशील खालील तक्त्यात देण्यात आलेला आहे. तसेच पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई आणि संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी हाती घ्यावयाच्या कार्यक्रमाचा बाबनिहाय सविस्तर तपशील सोबतच्या परिशिष्ट A, B, आणि C मध्ये देण्यात आलेला आहे.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | शीर्ष | पो.म.सं. यांना मंजूर झालेली रक्कम | पो.आ.मुं. यांना मंजूर झालेली रक्कम | एकूण मंजूर रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | बिल्डींग्ज | ८३२.४८ | ४५०.००. | १,२८२.४८ |
| २ | वेपनरी | ३०.४०. | २८२.२९ | ३१२.६९ |
| ३ | कम्युनिकेशन | १,०१०.०८ | ५००.००. | १,५१०.०८ |
| ४ | ट्रेनिंग इक्वीपमेंट | --- | २४५.००. | २४५.००. |
| ५ | इक्वीपमेंट | ८४८.५५ | २५४.०१ | १,१०२.५६ |
| ६ | फॉरेन्सीक लॅबोरेटरी | --- | --- | २,२११.१५ |
| ७ | मोबिलीटी | १,१४७.२१ | ११६७.४०. | २,३१४.६१ |
| ८ | कॉम्प्युटरायझेशन | २२९.६९ | ३६०.००. | ५८९.६९ |
| ९ | पोलीस हाऊसिंग | ६८०.३८ | ३२५०.००. | ३,९३०.३८ |
| | एकूण :- | ४,७७८.७९ | ६,५०८.७०. | १३,४९८.६४ |

४. केंद्र शासनाने वरीलप्रमाणे मंजूर केलेल्या रु.१३४९८.६४ लक्ष रकमेच्या कार्यक्रमाला शासन आता प्रशासकीय मंजूरी देत असून तितका निधी खर्च करण्यास मान्यता देत आहे. उपरोक्त तीन्ही तक्त्यांमध्ये जो कार्यक्रम दर्शविण्यात आलेला आहे त्यावरील खर्च अंदाजित असून शासनाच्या प्रचलित नियमावलीनुसार प्रत्येक बाबनिहाय खर्च हा विहित पध्दतीने व विहित करण्यात आलेल्या मर्यादेच्या अधिन राहून करण्यात यावा.

GR-20020122-171906000-0200

५. पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाच्या योजनेतंर्गत प्रशासकीय मान्यता मिळालेली साधनसामुग्री विकत घेतांना खरेदीसाठी शासनाने (उद्योग,उर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र.भांखस-१०८८/२५१२/उद्योग-६, दि. २ जानेवारी, १९९२ अन्वये) विहित केलेल्या कार्यपध्दतीचा काटेकोरपणे अवलंब करण्यात यावा. तसेच कार्यक्रमाची अंमलबजावणी विहित पध्दतीने व शीर्षनिहाय विहित करण्यात आलेल्या मर्यादेच्या अधिन राहून करण्यात यावी.

६. पोलीस महासंचालक व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी या कार्यक्रमांतर्गत **"बिल्डींग व पोलीस गृहनिर्माण"** या शीर्षाखाली मंजूर झालेली रक्कम **महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाला** व संबंधित **अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र शासन** यांना कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी सत्वर उपलब्ध करुन द्यावी. असे करतांना कोणते प्रकल्प महामंडळाला हाती घेणे शक्य आहे याबाबत महामंडळाशी सल्लामसलत करुन निर्णय घेण्यात यावा. बांधकामाच्या अंदाज पत्रक व नकाशास विहित पध्दतीने सक्षम प्राधिकाऱ्यांकडून प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतरच बांधकामावर खर्च करण्यात यावा.

७. चालू सन २००१-०२ च्या अर्थसंकल्पात पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाच्या चालू वर्षाच्या योजनेकरिता मागणी क्र.बी-६, लेखाशीर्ष "२०५५-पोलीस, ११५-पोलीस दलाचे आधुनिकीकरण, ११५-(२) जिल्हा पोलीस, (२०५५०३४६), ३२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री" खाली एकूण रु.२४२.२९ कोटी इतक्या रकमेची तरतुद करण्यात आलेली आहे. सदर रकमेपैकी रु.७६.१६ कोटी इतकी रक्कम सन २०००-०१ मधील शिल्लक कार्यक्रम राबविण्यासाठी दि.२१.१२.२००१ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली आहे. त्यामुळे रु.१६६.१३ कोटी इतका निधी शिल्लक राहतो. सबब सदर शिल्लक रकमेपैकी रु.६५०८.७० लक्ष इतकी रक्कम पुनर्विनियोजनाद्वारे त्याच प्रधान लेखाशीर्षाखाली "११५-पोलीस दलाचे आधुनिकीकरण, ११५-(१) शहर पोलीस, (२०५५०३०१), ३२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री" खाली पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांना आणि रु.२२११.१५ लक्ष इतकी रक्कम त्याच प्रधान लेखाशीर्षाखाली "११५-पोलीस दलाचे आधुनिकीकरण, ११५-(३) न्यायसहायक विज्ञान, (२०५५०३५५), यंत्रसामुग्री व साधनसामुग्री" खाली संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना तर त्याच लेखाशीर्षाखाली "११५-(२) जिल्हा पोलीस, (२०५५०३४६)" शिल्लक रक्कम रु.४७७८.७९ लक्ष पोलीस महासंचालक यांना उपलब्ध करुन देण्यास व ती विहित पध्दतीने खर्च करण्यास शासन मंजूरी देत आहे. प्रस्तुत प्रकरणी खरेदीची कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर विनियोजन प्रमाणपत्रे शासनाला सत्वर सादर करण्यात यावीत.

GR-2002.0122.171906000-0200

८.	हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक-सीआर १८७८/व्यय-७/२००१, दिनांक ३१.१२.२००१ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

५/१/२००२

( रा. बा. घांडगे )

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई.

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

वित्त विभाग (व्यय-७/अर्थसंकल्प-१०/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.

गृह विभाग (बीयुडी-१/पोल-७/पोल-५-अ), मंत्रालय, मुंबई.

निवड नस्ती............. GR-2002012217190600-0200